**शेतकरी आत्महत्याग्रस्त जिल्हयातील शेतक-यांच्या आत्महत्या रोखण्यासाठी विशेष मदतीच्या कार्यक्रमासाठी निधी उपलब्ध करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माआका -२०१५ /प्र.क्र. ३०६ /आ-३(अ)**
गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, १० वा मजला, ए विंग
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: २४ सप्टेंबर,२०१५

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः सा.आ.वि.क्र. माआका-२०१५ / प्र.क्र. ३०६ /आ-३अ, दि. ०४/०९/२०१५
२) शासन ज्ञापन, वित्त विभाग, क्रमांक-आकनि-२०१५/प्रक्र.१३/अर्थसंकल्प-९, दि. ११/०९/२०१५

प्रस्तावना :-

शेतकरी आत्महत्याग्रस्त जिल्हयातील शेतक-यांच्या आत्महत्या रोखण्यासाठी विशेष मदतीचा कार्यक्रम राबविण्यास संदर्भाधिन शासन निर्णय दि. ०४/०९/२०१५ अन्वये तत्वत: मान्यता देण्यात आली आहे. वित्त विभागाच्या ज्ञापन क्रमांक-आकनि-२०१५/प्रक्र.१३/अर्थसंकल्प-९, दि. ११/०९/२०१५ अन्वये आकस्मिकता निधीमधून रुपये ७.६५६६ कोटी अग्रीमास मान्यता देण्यात आली आहे.

संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील मराठवाडा व विदर्भ विभागातील औरंगाबाद,जालना, हिंगोली,बीड, नांदेड, लातूर,अकोला, यवतमाळ, वाशीम, परभणी, उस्मानाबाद, अमरावती, बुलढाणा व वर्धा अशा १४ जिल्हयांमध्ये सर्व शेतक-यांना शाश्वत आरोग्य सेवा देण्यात येणार आहे. या १४ जिल्हयात पहिल्या टप्प्यात खालीलप्रमाणे योजना राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

१) आत्महत्याप्रवण १४ जिल्हयांपैकी अमरावती, बीड, बुलढाणा, हिंगोली, जालना, उस्मानाबाद, परभणी, वाशीम आणि वर्धा या ९ जिल्हयातील जिल्हा रुग्णालयात व अकोला, औरंगाबाद, नांदेड, लातूर आणि यवतमाळ या ५ उपजिल्हा रुग्णालयात मानसोपचार कक्षाचे विस्तारीकरण करणे.
२) आशा कार्यकर्त्यांना प्रशिक्षण देणे.
३) राज्यस्तरीय कंत्राटी नियुक्त्यांचा मोबदला.

## शासन निर्णय:-

आकस्मिकता निधीतील अग्रीमामधून उपरोक्त योजना राबविण्यासाठी खालीलप्रमाणे तपशीलवार कार्यक्रमास मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर प्रकल्पास “प्रेरणा प्रकल्प-शेतकरी मानसिक आरोग्य सेवा कार्यक्रम” असे संबोधण्यात येईल.

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>बाब व लेखाशीर्ष</th><th>वार्षिक खर्च</th><th>आकस्मिकता निधी मधून आग्रीमासाठी मान्य टक्केवारी</th><th>मान्यतेचा तपशील</th></tr>
<tr><td>१</td><td>DMHP वेतने (कंत्राटी)<br>(०१ वेतन)</td><td>२.१६ कोटी</td><td>२५%</td><td>औरंगाबाद,जालना, हिंगोली, लातुर, बीड, नांदेड, अकोला, वाशीम व यवतमाळ, या ९ जिल्हयांसाठी विस्तारीत मानसोपचार कक्षामधील पदे व कंत्राटी वेतन
<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>पदाचे नाव</th><th>कंत्राटी मासिक वेतन रुपये</th></tr>
<tr><td>१</td><td>मानसोपचार तज्ञ</td><td>७०,०००/-</td></tr>
<tr><td>२</td><td>चिकित्सालयीन मानसशास्त्र तज्ञ</td><td>४०,०००/-</td></tr>
<tr><td>३</td><td>मानसोपचार सामाजिक कार्यकर्ता</td><td>३०,०००/-</td></tr>
<tr><td>४</td><td>मनोविकृती परिचारीका</td><td>२५,०००/-</td></tr>
<tr><td>५</td><td>सामाजिक परिचारीका</td><td>२५,०००/-</td></tr>
<tr><td>६</td><td>अकाऊटंट कम केस रजिस्ट्री असिस्टंट</td><td>१०,०००/-</td></tr>
</table></td></tr>
<tr><td>२</td><td>अनावर्ती खर्च पायाभूत सुविधासाठी (१३-कार्यालयीन खर्च)</td><td>२७ लक्ष</td><td>१०० %</td><td>अनावर्ती खर्च (राज्य व जिल्हास्तरीय )<br>१)पदभरती प्रक्रिया राबविणे<br>२)मानसोपचार कक्ष व समुपदेशन कक्षाकरीता पायाभूत सुविधा<br>(फर्निचर,संगणक,इंटरनेट,टेलिफोन इ.) उपलब्ध करुन देणे.</td></tr>
<tr><td>३</td><td>प्रशिक्षण (५० - इतर खर्च)</td><td>३६ लक्ष</td><td>१००%</td><td>जिल्हयातील वैद्यकीय अधिकारी व आरोग्य कर्मचारी यांचे मानसिक आरोग्यबाबत प्रशिक्षण घेणे</td></tr>
<tr><td>४</td><td>IEC (२६-जाहिरात व प्रसिध्दी)</td><td>३६ लक्ष</td><td>५०%</td><td>पोस्टर्स, बॅनर्स, हॅडबिल,इतर जाहिराती इ.</td></tr>
<tr><td>५</td><td>औषधे<br>(२१-पुरवठा व सामुग्री)</td><td>९० लक्ष</td><td>५० %</td><td>इ.डी.एल./इ.सी.एल. यादीप्रमाणे<br>( औषधे आवश्यकतेप्रमाणे )</td></tr>
</table>

<table>
<tr><td>६</td><td>उपकरणे<br>(२१-पुरवठा व सामुग्री)</td><td>५४ लक्ष</td><td>५० %</td><td>आवश्यकतेनुसार</td></tr>
<tr><td>७</td><td>Operational Expenses (१३-कार्यालयीन खर्च)</td><td>९० हजार</td><td>१००%</td><td>राज्य व जिल्हास्तरीय- टेलिफोन देयके,इंटरनेट देयक, इतर कार्यालयीन खर्च व अनुषंगीक बाबी</td></tr>
<tr><td>८</td><td>संकीर्ण<br>(२४- पेट्रोल,तेल,वंगण)</td><td>४०.५० लक्ष</td><td>२५%</td><td>राज्य व जिल्हास्तरीय- मानसिक आरोग्य पथकास कंत्राटी वाहन खर्च,इंधन,वंगण, प्रवास भत्ता, दैनिक भत्ता, कार्यालयीन साहित्य इ.</td></tr>
<tr><td>९</td><td>आशा वर्कर्स मोबदला<br>(०१ - वेतन)</td><td>१७.७८ कोटी</td><td>२५%</td><td>आत्महत्याग्रस्त १४ जिल्हयामध्ये सर्वेक्षण करणे,मानसिक आजाराचे वर्गीकरण करणे व संदर्भीत करणे यासाठी आशाला कामावर आधारीत प्रोत्साहन भत्ता</td></tr>
<tr><td>१०</td><td>आशा प्रशिक्षण<br>(५०-इतर खर्च)</td><td>९९.८६ लक्ष</td><td>१००%</td><td>आत्महत्याग्रस्त १४ जिल्हयातील सर्व आशा कार्यकर्ती गट प्रवर्तक यांना मानसिक आरोग्य व राजीव गांधी जिवनदायी आरोग्य योजनेबाबत प्रशिक्षण देणे.</td></tr>
<tr><td>११</td><td>कंत्राटी मोबदला ६ महिने<br>(०१-वेतन)</td><td>३.९० लक्ष</td><td>१००%</td><td>आरोग्य सेवा संचालनातील मानसिक आरोग्य कक्षाचे बळकटीकरण करणे
<table>
<tr><td>अ.क्र</td><td>पदाचे नाव</td><td>कंत्राटी मासिक वेतन रुपये</td></tr>
<tr><td>१</td><td>प्रोग्रॅम ऑफिसर</td><td>२५,०००/-</td></tr>
<tr><td>२</td><td>मॉनिटरी ॲण्ड इव्हयालुएशन ऑफिसर</td><td>२५,०००/-</td></tr>
<tr><td>३</td><td>सांख्यिकी अन्वेषक</td><td>१५,०००/-</td></tr>
</table></td></tr>
</table>

शेतकरी आत्महत्या रोखण्यासाठी विशेष मदतीचा कार्यक्रम राबविण्यासाठी रु. ७.६५६६ कोटी इतका खर्च करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे. हा खर्च वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.४७७ /२०१५, दि.११/०८/२०१५ अन्वये आकस्मिकता निधीतून मंजूर झालेल्या रु.७.६५६६ कोटी इतक्या अग्रीमातून भागविण्यात यावा.

यासाठी होणारा खर्च पुढील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.आर-१**

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०१ - नागरी आरोग्य सेवा -विषम चिकित्सा

११० - रुग्णालये व दवाखाने
०५ - मनोरुग्णालये
(०५ ) (०१) - मनोरुग्णालये
०१ वेतन रक्कम
१३ कार्यालयीन खर्च
२१ पुरवठा व सामग्री
२४ पेट्रोल,तेल,वंगण
२६ जाहिरात व प्रसिध्दी
५० इतर खर्च (प्रशिक्षण)
**(२२१० ०२१७)**

आकस्मिकता आग्रीमाद्वारे मंजूर झालेली रक्कम खर्च करताना वित्त विभागाचे परिपत्रक क्र.सीएनएफ १०८३/१४०/ अर्थ-३ ,दि.२६ /०४/१९८३ व सीएनएफ १०८६/१५३ अर्थ-३,दि. २८/ ०८/ १९८६ अन्वये विहित केलेल्या सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी होईल याची दक्षता संचालक आरोग्य सेवा, मुंबई यांनी घ्यावी. सदर रक्कम रु. ७.६५६६ कोटी वितरीत करण्यास अतिरिक्त संचालक (मा. आ.) आरोग्य सेवा, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

वित्त विभागाच्या क्र. सीएनएफ-१०८६/१५३/अर्थ-३, दि. २८ /०८ /१९८६ च्या शासन परिपत्रकातील परिच्छेद क्र. २ (१) नुसार संचालक,आरोग्य सेवा,मुंबई यांनी आकस्मिकता निधीतून खर्च करण्यासाठी आंहरण व संवितरण अधिका-याकडे रक्कम सुपूर्द करण्याच्या आदेशात आगाऊ रकमेतून खर्च करताना सादर करण्यात येणा-या देयकावर आकस्मिकता निधी अग्रीम वित्त विभाग ज्ञापन क्र.आकनि २०१५/प्रक्र१३/अर्थ ९ दि.११.९.२०१५ (आकस्मिकता निधी सांकेताक ८००० ७११७) अन्वये मंजूर असे लाल शाईने लिहावे व देयकावर संगणक सांकेतांक न चुकता नमूद करावा अशी सूचना त्या आदेशात अंतर्भूत करावी व ती सूचना लाल शाईने अधोरेखित करण्यात यावी.

सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र४७७/व्यय १३/दि.११.८.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५०९१५१५४९२२१४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shekhar Vasantrao Dhawale

Digitally signed by Shekhar Vasantrao Dhawale
DN: CN = Shekhar Vasantrao Dhawale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.09.24 14:13:51 +05'30'

(शेखर ढवळे)
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.

२. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (मानसिक आरोग्य), मुंबई.
३. सह संचालक (आरोग्य), आरोग्य सेवा, पुणे.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये राज्यस्तर), मुंबई.
५. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता)मुंबई /नागपूर
६. उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळे - सर्व
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, ( औरंगाबाद, जालना, हिंगोली, बीड, नांदेड, लातूर, अकोला, यवतमाळ, वाशीम, परभणी, उस्मानाबाद, अमरावती, बुलढाणा, वर्धा)
९. जिल्हा शल्य चिकित्सक (औरंगाबाद, जालना, हिंगोली, बीड ,नांदेड, लातूर, अकोला, यवतमाळ, वाशीम, परभणी, उस्मानाबाद, अमरावती, बुलढाणा, वर्धा)
१०. निवडनस्ती, आ-३ अ